छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार,२०१३ -
पुरस्कार प्राप्त व्यक्ती / संस्थांची नावे जाहीर
करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वनश्री-२०१५/प्र.क्र. ५१/फ-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ जून, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एसएलएफ-१८८८/प्र.क्र.१२१७/फ-१२, दिनांक २३ जून, १९८८
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक : एसएलएफ-१८९३/प्र.क्र.२३२/जल-१२, दिनांक ९ ऑगस्ट, १९९४
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक : एसएलएफ-१८९३/प्र.क्र.२३२/जल-१२, दिनांक ७ एप्रिल, २००३
४) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक : एसएलएफ-१८/०६/प्र.क्र.३६/जल-१२, दिनांक १० मे, २००६
५) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक: एसएलएफ-२००७/प्र.क्र.१८८/जल-१२, दिनांक ३० जून, २००८
६) शासन शुध्दिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक: एसएलएफ-२००९/प्र.क्र.५५/जल-१२, दिनांक २० ऑगस्ट, २००९
७) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक : एसएलएफ-२०११/प्र.क्र.४२/जल-१२, दिनांक २७ जून, २०११
८) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक एसएलएफ-२०१२/प्र.क्र.७६/जल-१२, दिनांक ६ जुलै, २०१३
९) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : वनश्री -२०१५/ प्र. क्र. २४/फ-२, दिनांक १८ मे, २०१५.

प्रस्तावना :-

राज्यातील वनेत्तर क्षेत्रामध्ये वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन यामध्ये उत्कृष्ट कामगिरी करणाऱ्या व्यक्ती व संस्था यांना सन्मानीत करण्यासाठी सन १९८८ पासून वर नमूद केलेल्या शासन निर्णयांद्वारे दरवर्षी महाराष्ट्र शासनातर्फे महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्कार प्रदान करण्यात येतो.

संदर्भाधीन दिनांक २७ जून, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्काराचे नामाभिदान बदलण्यात आले असून छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार असे सुधारीत करण्यात आले आहे.

उपरोक्त संदर्भाधीन क्र. ५ येथील दिनांक ३० जून, २००८ रोजीच्या शासन निर्णयानुसार देण्यात येणाऱ्या वनश्री पुरस्कारांच्या रकमेत तसेच वृक्षमित्र पुरस्काराच्या रकमेत संदर्भाधीन क्र. ८ येथील दिनांक ६ जुलै, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे वाढ करण्यात आली असून सदर पुरस्कारांचे सुधारीत दर सन २०११ रोजीच्या पुरस्कार वितरणापासून लागू करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**(अ) महसूल विभाग (वृत्तस्तर) संवर्गनिहाय पुरस्कार :**

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) |
|---|---|---|---|
| १ | व्यक्ती | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| २ | ग्रामपंचायत | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| ३ | शैक्षणिक संस्था | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| ४ | सेवाभावी संस्था | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| ५ | ग्राम/विभाग/जिल्हा | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |

**(ब) राज्यस्तरीय संवर्गनिहाय पुरस्कार:**

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) | तृतीय पुरस्कार (५) |
|---|---|---|---|---|
| १ | व्यक्ती | रु. १,००,०००/- | रु. ७५,०००/- | रु. ५०,०००/- |
| २ | ग्रामपंचायत | रु. १,००,०००/ | रु. ७५,०००/ | रु. ५०,०००/- |
| ३ | शैक्षणिक संस्था | रु. १,००,०००/ | रु. ७५,०००/ | रु. ५०,०००/- |
| ४ | सेवाभावी संस्था | रु. १,००,०००/ | रु. ७५,०००/ | रु. ५०,०००/- |
| ५ | ग्राम/विभाग/जिल्हा | रु. १,००,०००/ | रु. ७५,०००/ | रु. ५०,०००/- |

सन २०१३ या वर्षाकरीता प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कारासाठी संपूर्ण राज्यातून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करुन योग्य व्यक्ती व संस्थांची निवड प्राथमिक छाननी समितीने केल्यानंतर प्राथमिक छाननी समितीचा अहवाल राज्यस्तरीय समितीकडे सादर केला होता.

सामाजिक वनीकरण विभाग हा ग्रामविकास व जलसंधारण विभागाकडून वन विभागात समाविष्ट झाला असल्याने संदर्भाधिन क्रमांक ९ येथील शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय मुल्यमापन समितीचे मा. मंत्री (वने) हयांचे अध्यक्षतेखाली पुर्नगठन करण्यात आले आहे. सदर राज्यस्तरीय मूल्यमापन समितीने सन २०१३ करीताच्या प्रस्तावांची छाननी करुन निवड केल्याप्रमाणे, राज्यातील व्यक्ती व संस्था यांना छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार, २०१३ जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे सन २०13 करीता खाली नमूद केलेल्या संवर्गातील व्यक्ती आणि संस्थांना, छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार - २०13 प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अ) वृत्तस्तरीय विजेते :**

**(१) पुणे वृत्त**

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) |
|---|---|---|---|
| १ | शैक्षणिक संस्था | सरस्वती शिक्षण प्रसारक मंडळ, मौजे मोहरे, ता.पन्हाळा, जि. कोल्हापूर | ----- |

**(२) ठाणे वृत्त**

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) |
|---|---|---|---|
| १ | शैक्षणिक संस्था | आदर्श शिक्षण संस्थेचे विद्याभवन एडवण, ता. पालघर, जि. ठाणे | माध्यमिक विद्यालय, विजयदुर्ग ता. देवगड, जि. सिंधुदुर्ग |

**(३) नाशिक वृत्त**

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) |
|---|---|---|---|
| १ | व्यक्ती | श्री. अनिल अमृत पाटील प्लॉट नं.४, नेहा पार्क, धुळे रोड, नंदुरबार | श्री. सुरेश सोपानराव खामकर पटवर्धन चौक, आनंदी बाजार, अहमदनगर |
| २ | ग्रामपंचायत | ग्रामपंचायत पिंप्री सैय्यद पिंप्री सैय्यद, ता.जि.नाशिक | ----- |
| ३ | शैक्षणिक संस्था | मालेगाव एज्युकेशन सोसायटी भुईकोट किल्ला, मालेगाव, जि. नाशिक | हस्ती पब्लिक स्कूल दोंडाईचा, ता.शिंदखेडा, जि. धुळे |

### (४) औरंगाबाद वृत्त

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) |
|---|---|---|---|
| १ | व्यक्ती | श्री. विनोद अच्युतराव कुटे पाटील काळेश्वर नगर, झरी विष्णुपुरी, ता.जि. नांदेड | ----- |
| २ | शैक्षणिक संस्था | अमन विश्व हायस्कूल धरतीधन सोसायटी, गादीया विहार, औरंगाबाद | कर्मवीर भाऊराव पाटील शिक्षण संस्था, उदगीर, जि. लातूर |

### (५) अमरावती वृत्त

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) |
|---|---|---|---|
| १ | व्यक्ती | श्री. अमर कैजिनाथ दिनकर मौजा बोथबोडन, रा. यवतमाळ, ता.जि. यवतमाळ | ----- |
| २ | शैक्षणिक संस्था | एडेड हायस्कूल व उच्च माध्यमिक विद्यालय चिखली रोड, बुलडाणा | ----- |

### (६) नागपूर वृत्त

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) |
|---|---|---|---|
| १ | व्यक्ती | श्री. रामधन नकटू धकाते मु.पो. लवारी, ता. साकोली, जि. भंडारा | ----- |
| २ | ग्रामपंचायत | ग्रामपंचायत सिरुड ता. हिंगणघाट, जि. वर्धा | ----- |
| ३ | शैक्षणिक संस्था | नीळकंठ मुरार घटवाई विदयालय व विज्ञान/कला कनिष्ठ महाविद्यालय, वडनेर ता. हिंगणघाट, जि. वर्धा | विनोद विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय सिल्ली, ता.भंडारा, जि. भंडारा |
| ४ | सेवाभावी संस्था | प्रगती मागासवर्गीय महिला सेवाभावी संस्था, भंडारा विदर्भ हाऊसिंग कॉलनी, जि. भंडारा | ----- |

ब) राज्यस्तरीय विजेते :

| क्र. (१) | संवर्ग (२) | प्रथम पुरस्कार (३) | द्वितीय पुरस्कार (४) | तृतीय पुरस्कार (५) |
|---|---|---|---|---|
| १ | व्यक्ती | श्री. अनिल अमृत पाटील<br>प्लॉट नं.४, नेहा पार्क, धुळे रोड, नंदुरबार | श्री. अमर कैजिनाथ दिनकर<br>मौजा बोथबोडन, रा. यवतमाळ,<br>ता.जि. यवतमाळ | श्री. रामधन नकटू धकाते<br>मु.पो. लवारी, ता. साकोली,<br>जि. भंडारा |
| २ | ग्रामपंचायत | ग्रामपंचायत सिरुड ता. हिंगणघाट, जि. वर्धा | ग्रामपंचायत पिंप्री सैय्यद<br>पिंप्री सैय्यद,<br>ता.जि.नाशिक | ----- |
| ३ | शैक्षणिक संस्था | एडेड हायस्कूल व उच्च माध्यमिक विद्यालय<br>चिखली रोड, बुलडाणा | सरस्वती शिक्षण प्रसारक मंडळ,<br>मौजे मोहरे,<br>ता.पन्हाळा, जि. कोल्हापूर | नीळकंठ मुरार घटवाई<br>विदयालय व विज्ञान/कला कनिष्ठ महाविद्यालय,<br>वडनेर<br>ता. हिंगणघाट,<br>जि. वर्धा |
| ४ | सेवाभावी संस्था | प्रगती मागासवर्गीय महिला सेवाभावी संस्था, भंडारा<br>विदर्भ हाऊसिंग कॉलनी, जि. भंडारा | ----- | ----- |

२. तसेच शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. एसएलएफ-१८/०६/प्र.क्र.३६/जल-१२/, दिनांक १० मे २००६, व शासन निर्णय २०१२/प्र.क्र.७६/जल-१२, दिनांक ६ जुलै २०१३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वृक्षलागवडीच्या कामात खाजगी संस्थांना प्रोत्साहित करण्यासाठी छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्काराच्या धर्तीवर **"वृक्षमित्र"** पुरस्काराचे प्रतीक म्हणून मानचिन्ह व रु. २५,०००/- इतक्या रकमेचे पुरस्कार प्रदान करण्यात येतात. सन २०१३ साठी वृक्षमित्र पुरस्कारांकरीता राज्यस्तरीय मूल्यमापन समितीच्या मान्यतेनुसार खालील दोन संस्थांच्या निवडीस मान्यता देण्यात येत आहे.

**(१) कल्याणी चॅरिटेबल ट्रस्ट, सपकाळ नॉलेज हब, नाशिक.**

**(२) सरस्वती विद्यालय, शेगाव (कुंड), ता.हिंगणघाट, जि. वर्धा.**

३. राज्य स्तरावर निवड झालेली व्यक्ती / संस्था यांना महसूल विभाग (वृत्त) स्तरावरील देय ठरणारी पुरस्काराची रक्कम व राज्यस्तरावरील प्रदान करण्यात येणा-या पुरस्काराची रक्कम यापैकी अधिकची रक्कम प्रदान करण्यात येईल. कोणत्याही परिस्थितीत पुरस्कार प्राप्त व्यक्ती / संस्था यांना देण्यात येणारी पुरस्काराची रक्कम ही राज्यस्तरावरील पुरस्काराच्या रकमेपेक्षा अधिक असणार नाही.

४. छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार राष्ट्रीय बचत प्रमाणपत्रे, स्मृतीचिन्ह व प्रशस्तीपत्र या स्वरुपात देण्यात येतील. पुरस्कार वितरण समारंभाचे आयोजन उपरोक्त नमूद शासन निर्णय क्रमांक एसएलएफ-१८९३/प्र.क्र.२३२/जल-१२, दिनांक ९ ऑगस्ट १९९४ अन्वये विहित केलेल्या मार्गदर्शनपर तत्वाप्रमाणे करण्यात यावे.

५. राज्यस्तरीय व वृत्तस्तरावरील पुरस्कार रकमेवर होणारा खर्च मागणी क्र. ३ खालील मुख्य लेखाशीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन १०१ वनसंरक्षण विकास व पुर्ननिर्मिती (११) (३४) वनमहोत्सव योजनेतर २४०६ ८५५१ योजनेतर योजना या उपशीर्षाखाली तसेच पुरस्कार आयोजनावरील खर्च २४०६ वनीकरण व वन्यजीवन ००३ शिक्षण व प्रशिक्षण (००) (०३) प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण योजनांतर्गत योजना, २६-जाहिरात व प्रसिध्दी २४०६ ८५८९ योजनांतर्गत योजना या उपशीर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षाकरिता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६२५१८५४०६९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.06.25 18:57:39 +05'30'

(डी.एल.थोरात)
सह सचिव (वने)

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्रयाचे प्रधान सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. सर्व मंत्री / मा. राज्यमंत्री
५) मा. सर्व विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य
६) मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
७) मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव

८) मा. मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
९) मा. राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
१०) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
११) मा. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) मा. सचिव (जलसंधारण), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मा. प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) मा. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१७) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) मुख्य वनसंरक्षक व उपमहासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, ठाणे/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१९) सर्व मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य
२०) सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग
२१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई
२२) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई
२३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, नागपूर
२४) महालेखापाल (लेखा परीक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर
२५) सर्व विभागीय आयुक्त (महसूल विभाग)
२६) सर्व जिल्हाधिकारी
२७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२८) प्रसिध्दी अधिकारी, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
२९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३१) कार्यासन अधिकारी, व्यय-१५ / अर्थ-१७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३२) सर्व संवर्गातील पुरस्कारप्राप्त संबंधितांना
३३) सहसचिव श्री. द.ल.थोरात, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३४) निवड नस्ती / फ-११ कार्यासन